अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि, जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ देण्याबाबत.
महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२०/प्र.क्र.२१/सां.का.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०८ मे, २०२३

**वाचा :** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी २०१९/प्र.क्र.५८१ अे/१६-ब, दि.१५.०६.२०२०
३) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.२१/सां.का.१, दि.२८.०९.२०२०
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२७.११.२०२०
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२८.१०.२०२१
६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी २०१९/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.१४.१२.२०२२
७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी २०१९/प्र.क्र.५८१ ए/१६-ब, दि.१४.१२.२०२२
८) मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्या., गोरेगाव, मुंबई यांचे पत्र क्र.जाप्रप-२०१९/प्र.क्र.८०/प्रशा-३/१५०, दि.०९.०३.२०२३.

**प्रस्तावना:**

संदर्भ क्र.७ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयान्वये मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपील क्र.८९२८/२०१५ व इतर याचिकामध्ये दि.०६.०७.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची राज्यात अंमलबजावणी करण्यासाठी निर्गमित करण्यात आलेल्या संदर्भान्वये विभागाच्या अधिनस्त महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित,गोरेगाव, मुंबई या कार्यालयातील परिचर (गट-ड) या सवंर्गात ३ अधिसंख्य पदांना तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरिता अथवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आले आहे.

अ) अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेले कर्मचारी,
आ) अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यानंतर विशेष मागासप्रवर्गाचे अथवा अन्य कोणत्याही मागासवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले कर्मचारी,
इ) नियुक्तीनंतर जात प्रमाणपत्राच्या पडताळणीसाठी विहित मुदतीत जात पडताळणी समितीकडे प्रस्ताव सादर न केलेले अनुसूचित जमातीचे कर्मचारी,
ई) ज्या कर्मचाऱ्यांनी त्यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरविण्याच्या जात पडताळणी समितीच्या निर्णयाच्या विरोधात माननीय न्यायालयात याचिका दाखल केल्या असतील मात्र त्यांच्या प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने किंवा मा.सर्वोच्च न्यायालयाने जात प्रमाणपत्र अवैध ठरविण्याच्या समितीच्या निर्णयास कोणतीही स्थगिती दिली नसेल असे कर्मचारी,

अधिसंख्य पदावर वर्ग केलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय करावयाच्या सेवा विषयक / सेवा निवृत्ती विषयक लाभांबाबत अभ्यास गटाच्या शिफारशीस मंत्रिमंडळाच्या निर्णयानुसार अधिसंख्य पदावर वर्ग केलेल्या कर्मचाऱ्यांना खालील सेवा विषयक व सेवा निवृत्ती विषयक लाभ अनुज्ञेय करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

अधिसंख्य पदावर कार्यरत शासकीय अधिकारी व कर्मचारी यांना मानवतावादी दृष्टीकोनातून व त्यांनी केलेल्या सेवेचा विचार करुन १ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन पुन्हा ११ महिन्यांच्या कालावधीकरीता त्यांच्या सेवा सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत सुरु ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**अ)** अनुसूचित जमातीचे जाती प्रमाणपत्र, जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पडताळणीसाठी विहीत मुदतीत प्रस्ताव सादर न केलेले परिचर (गट-ड) मधील ०२ पदांना सन २०२१ व २०२२ या वर्षाकरिताच्या मुदतवाढीसाठी कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

**सन २०२१ (२ अधिसंख्य पदे)**

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | पदनाम व गट | नियुक्तीचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती शेवंती हडळ | परिचर (गट-ड) | ०५.०१.१९९९ | ३१.१०.२०२२ (से.नि.) |
| २ | श्रीमती भारती पाटकर | परिचर (गट-ड) | ०१.०७.१९९७ | ३०.०९.२०३० |

**सन २०२२ (२ अधिसंख्य पदे)**

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | पदनाम व गट | नियुक्तीचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती शेवंती हडळ | परिचर (गट-ड) | ०५.०१.१९९९ | ३१.१०.२०२२ (से.नि.) |
| २ | श्रीमती भारती पाटकर | परिचर (गट-ड) | ०१.०७.१९९७ | ३०.०९.२०३० |

**ब)** अनुसूचित जमातीचे जाती प्रमाणपत्र, जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पडताळणीसाठी विहीत मुदतीत प्रस्ताव सादर न केलेले परिचर (गट-ड) मधील ०१ अधिसंख्य पदास तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरीता किंवा ते सेवेत राहीले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंतच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

**सन २०२३ (१ अधिसंख्य पद)**

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | पदनाम व गट | नियुक्तीचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती भारती पाटकर | परिचर (गट-ड) | ०१.०७.१९९७ | ३०.०९.२०३० |

०२. अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणारे कर्मचारी सध्या ज्या पदावर कार्यरत आहेत त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करण्यात येत असून सर्व संबंधित नियुक्ती अधिकाऱ्यांनी करावयाच्या नियुक्त्या तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरीता किंवा ते सेवेत राहीले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंतच्या कालावधीसाठी कराव्यात. सदर कर्मचारी यांच्याकरीता सदर अधिसंख्य पद अस्तित्वात राहील.

०३. अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यामुळे संबंधित कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आले आहे. त्यामुळे रिक्त झालेली अनुसूचित जमातीची पदे भरण्यासाठी संबंधित विभागांनी एक कालबध्द कार्यक्रम आखून विशेष भरती मोहिम राबवावी. गट-क व गट-ड मधील पदे भरण्याची कार्यवाही दि.३१ जुलै, २०२३ पर्यंत पूर्ण करावी.

०४. या आदेशान्वये निर्माण केलेल्या अधिसंख्य पदावर नियुक्ती देण्याबाबतचे आदेश सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन १६ ब, शासन निर्णय दि.२१.१२.२०१९ नुसार महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित,गोरेगाव, मुंबई यांनी तात्काळ निर्गमित करावेत व त्याची प्रत या विभागास तात्काळ उपलब्ध करुन द्यावी.

०५. अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यामुळे ज्या शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना अधिसंख्य पदावर वर्ग केले आहे अशा अधिसंख्य पदावरील अधिकारी व कर्मचारी यांना सेवा विषयक तसेच सेवा निवृत्तीचे लाभ देण्यात यावेत. यामध्ये पदोन्नती व अनुकंपा धोरण याचा लाभ मिळणार नाही.

०६. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीसीसी २०१९/प्र.क्र.५८१ ए/१६-ब, दि.१४.१२.२०२२ च्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०५०८१२५२५५२९२३ असा आहे. उक्त शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.05.11 12:07:40 +05'30'

**( विद्या वाघमारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री,सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक
३. उप सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई
५. वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई
६. महालेखापाल ( लेखा व अनु ज्ञेयता )-१, महाराष्ट्र,मुंबई
७. महालेखापाल ( लेखापरीक्षा )-१, महाराष्ट्र, मुंबई
८. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग (१६ ब), मंत्रालय, मुंबई
९. निवडनस्ती (सां.का.१).